शाळांच्या उपहारगृहात HFSS Food ठेवण्यास व विक्री करण्यास बंदी घालण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः शापोआ-२०१६/प्र.क्र.२४३/एस.डी.३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ०८ मे, २०१७

**संदर्भ -**

मा. मंत्री (महिला व बालविकास मंत्रालय) केंद्र सरकार, नवी दिल्ली यांचे दि. १५/१२/२०१५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना -**

महिला व बाल विकास मंत्रालय, केंद्र सरकार, नवी दिल्ली यांनी शाळेतील विद्यार्थ्यांना जादा मीठ, साखर आणि मेदयुक्त पदार्थ वर्जित करण्याबाबत व आरोग्यास लाभकारक असलेले पदार्थाचा वापर करण्याबाबत विद्यार्थ्यांना प्रोत्साहित करणे यासाठी संचालक, राष्ट्रीय पोषण संस्था, हैद्राबाद यांच्या अध्यक्षतेखाली एक कार्यगट गठित केला होता.

सदर कार्यगटाने विद्यार्थ्यांच्या आहारातील पोषण मुल्ये सुधारुन त्यांचा चांगल्या पध्दतीने शारिरिक व मानसिक विकास होण्यासाठी अनेक शिफारशी केल्या आहेत. यापैकी एक शिफारस शाळेच्या उपहारगृहात कोणते पदार्थ ठेवावेत व कोणते पदार्थ ठेवू नयेत याबाबतची आहे. त्यानुसार शाळेच्या उपहारगृहात HFSS Food (High in fat, salt and sugar) विकण्यास बंदी घालावी, असे कार्यगटाने सूचित केले आहे. कार्यगटाने केलेल्या व्याख्येनुसार HFSS Food (जंक फूड) म्हणजे ज्या पदार्थात साखर, मीठ व मेदाचा समावेश जास्त प्रमाणात असते व ज्यामध्ये सूक्ष्म अन्नद्रव्याची कमतरता असते व ज्यामुळे लठ्ठपणा, दातांचे विकार, मधुमेह व ह्दयरोग वाढीस लागण्यास मदत होते. विद्यार्थ्यांचे आरोग्य शालेय जीवनापासूनच निरोगी राहण्याच्या दृष्टीने कार्यगटाने केलेल्या शिफारशीनुसार HFSS Food (जंक फूड) शाळांच्या उपहारगृहात ठेवण्यास व त्याची विक्री करण्यास प्रतिबंध घालण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**परिपत्रक -**

HFSS Food मध्ये जीवनसत्वे व खनिजांची असणारी कमतरता आणि मीठ, साखर व मेदाचे असणारे अतिप्रमाण यामुळे विद्यार्थ्यांमध्ये लठ्ठपणा व अन्य आजारांचे प्रमाण वाढत आहे. ज्याचा परिणाम विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक कार्यक्षमतेवर होतो. त्यामुळे सोबत जोडलेल्या विवरणपत्र “अ” मध्ये नमूद असलेले अन्नपदार्थ शाळांच्या उपहारगृहात विक्रीसाठी ठेवणे व त्यांची विक्री

करण्यास प्रतिबंध घालण्यात येत आहे. सदर प्रतिबंधित पदार्थ शाळांच्या उपहारगृहात आढळणार नाहीत, याची दक्षता सर्व मुख्याध्यापक व शाळा व्यवस्थापनाने घ्यावी.

तसेच, शरीरास हानिकारक असणारे HFSS Food ऐवजी अन्य पोषक पदार्थांचे सेवन अधिकाधिक केल्याने होणारे फायदे याबाबत विद्यार्थ्यांमध्ये जागृती निर्माण करणे आवश्यक आहे. त्यादृष्टीने सोबत जोडलेल्या विवरणपत्र “ब” मधील पदार्थांचा शाळेच्या उपहारगृहात समावेश करावा. विवरणपत्र “अ” येथे नमूद खाद्यपदार्थ वर्ज्य करणे व विवरणपत्र “ब” येथील नमूद अन्नपदार्थांचे सेवनाबाबत विद्यार्थ्यांचे समुपदेशन शाळास्तरावरुन करण्यात यावे. याबाबत परिसरातील आहारतज्ञ व इंटरनेटवर उपलब्ध असणाऱ्या माहितीचा आधार शाळांनी घ्यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०८१११८५८५८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod Abaji Patil

Digitally signed by Pramod Abaji Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, cn=Pramod Abaji Patil
Date: 2017.05.08 15:23:50 +05'30'

**(प्रमोद पाटील)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे विशेष कार्य अधिकारी.
५. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
७. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
८. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
९. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१०.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक)
१२. शिक्षणाधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
१३. शिक्षक निरिक्षक, दक्षिण उत्तर व मध्य विभाग, मुंबई
१४.निवड नस्ती - एस.डी.३

## विवरणपत्र “अ”

| शाळेतील उपहारगृहात प्रतिबंधित पदार्थ | |
|---|---|
| १. | चिप्स, तळलेले पदार्थ जसे की, बटाटयाचे चिप्स व इतर |
| २. | स्थानिक उत्पादकांनी तयार केलेले चिप्स, सरबत, बर्फाचा गोळा (आइस गोला) |
| ३. | शर्करायुक्त कार्बोनेटेड शीतपेय आणि नॉन कार्बोनेटेड शीतपेय |
| ४. | गोड रसगुल्ले, गुलाबजामुन, पेढा, कलाकंद |
| ५. | नुडल्स, पिझ्झा, बर्गर, टिक्का, पाणी-पुरी (गोल गप्पे) |
| ६. | सगळया प्रकारच्या चघळण्याच्या गोळया आणि कँडी |
| ७. | जे पदार्थ ३० टक्के पेक्षा जास्त शर्करायुक्त असतात जसे की, जलेबी, इमरती, बुंदी इ. |
| ८. | सगळ्या प्रकाराची चॉकलेटस् |
| ९. | सगळया प्रकारची मिठाई |
| १०. | केक आणि बिस्कीट |
| ११. | बन्स आणि पेस्ट्री |
| १२. | जाम आणि जेली |

## विवरणपत्र “ब”

| शाळेतील उपहारगृहात ठेवण्यास शिफारस केलेले पदार्थ | |
|---|---|
| १. | गहू रोटी/पराठा कि ज्यामध्ये ऋतुनिहाय भाज्या वापरलेल्या असाव्यात |
| २. | एकापेक्षा जास्त धान्याची रोटी/पराठा की ज्यामध्ये ऋतुनिहाय भाज्या वापरलेल्या असाव्यात. |
| ३. | भात, भाजी पुलाव आणि डाळ |
| ४. | भाजी पुलाव |
| ५. | भात आणि काळा चना |
| ६. | गव्हाचा हलवा सोबत काळा चना |
| ७. | गोड दलिया सोबत नमकिन दलिया भाजी |
| ८. | भात आणि पांढरा चना |
| ९. | भात आणि राजमा |
| १०. | कढी भात |

| | |
|---|---|
| ११. | बलगर गव्हू उपमा किंवा खिचडी/ हिरवे आणि डाळ कट्टू, पायसाम, पपई/टोमॅटो/ अंडी |
| १२. | चिंचेचा भात/ हिरवे कट्टू बरोबर डाळ/बलाहार पायासम, पपई/टोमॅटो/ हिरवे चणे |
| १३. | डाळभात, हिरवे आणि डाळ कट्टू,बलाहार पायासम, पपई/टोमॅटो, बेंगाल चणे |
| १४. | भात, सांबर |
| १५. | इडली, वडा, सांबर |
| १६. | खीर, फिरनी, दूध आणि दुग्धजन्य पदार्थ जसे की, दही, ताक, लस्सी<br>(कमी प्रमाणात साखर) |
| १७. | भाज्यांचा उपमा |
| १८. | भाज्यांचे सॅण्डवीच |
| १९. | भाज्यांची खिचडी |
| २०. | नारळाचे पाणी, शिकंजी, जलजीरा इ. |

- शाळेचे भौगोलिक ठिकाण, ऋतू, परिसरातील खाण्याच्या सवयी आदी विचारात घेऊन शाळांना उपरोक्त खाद्यपदार्थांशी साधर्म्यता असणारे खाद्यपदार्थ निवडण्यास मुभा राहील.